**राज्यातील नागरी सहकारी बँका व सहकारी पतसंस्था मार्फत केली जाणारी कर्जवसूली व जप्तीची कार्यवाही करतांना पोलीस संरक्षण देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन परिपत्रक क्र. याचिका-०११९ /०१/ प्र.क्र.०१/ विशा-१ अ**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: २९ जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना -:**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे डोंबिवली नागरी सहकारी बँक लि. विरूध्द महाराष्ट्र शासन ही रिट याचिका क्र. १२/२०१९ दाखल केली आहे. मा. न्यायालयाने याचिकेस अनुसरून राज्यातील नागरी सहकारी बँका व सहकारी पतसंस्थांकडून कर्जदारांनी घेतलेले कर्ज विहीत कालावधीत न फेडल्यास त्या कर्जाच्या वसुलीदरम्यान SARFAESI Act, २००२ मधील सेक्शन १४ अंतर्गत मुख्य महानगर दंडाधिकारी किंवा जिल्हा न्यायाधीश यांनी निर्गमित केलेल्या आदेशाची तहसीलदार तसेच पोलीस अधिकाऱ्यांकडून योग्य प्रकारे अंमलबजावणी करण्याबाबत शासनाकडून दुय्यम क्षेत्रीय स्तरावरील पोलीस अधिकाऱ्यांना परिपत्रकान्वये सूचना निर्गमित करण्यात याव्यात असे आदेश दिले आहेत. SARFAESI Act, २००२ मधील सेक्शन १४ अंतर्गत मा. न्यायालयाने आदेश निर्गमित केले असल्यास संबंधित ठिकाणी बँकेच्या वसुली व जप्तीच्या कारवाईदरम्यान पोलीसांकडून बंदोबस्त पुरविण्याच्या संदर्भात खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

**परिपत्रक:**

१) सर्व पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांनी राज्यातील नागरी सहकारी बँका व सहकारी पतसंस्था यांचेकडून केल्या जाणाऱ्या वसुलीच्या कामासाठी संरक्षणाची मागणी केल्यास त्याची तातडीने पूर्तता करावी.

२) नागरी सहकारी बँका व सहकारी पतसंस्थांच्या जप्तीच्या प्रकरणामध्ये SARFAESI Act, २००२ मधील सेक्शन १४ अंतर्गत मा. न्यायालयाने दिलेल्या आदेशाचे अनुपालन करून पोलीस बंदोबस्त पुरविण्यात यावा. संबंधित बँकेच्या कर्जवसुली व जप्तीच्या कारवाईदरम्यान कागदपत्रांची पुनर्तपासणी पोलीसांमार्फत करण्यात येऊ नये.

३) सर्व पोलीस घटक प्रमुखांनी, पोलीस आयुक्त व जिल्हा पोलीस अधीक्षक यांनी आपल्या कार्यक्षेत्रातील नागरी सहकारी बँका व सहकारी पतसंस्था यांचे समवेत दर तीन महिन्यांतून एकदा आढावा बैठक घ्यावी. संरक्षणातील अडीअडचणी समजून घ्याव्यात व त्यावर उपाययोजना करावी. तसेच मोठ्या कर्जवसुलीची प्रकरणे दीर्घकालीन प्रलंबित असल्यास अशा प्रकरणांचा निपटारा करण्यासाठी बैठकीमध्ये प्राध्यान्याने विचार करण्यात यावा.

४) राज्यातील नागरी सहकारी बँका व सहकारी पतसंस्था यांचेकडील थकबाकीदारांची यादी पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांच्या कार्यालयाकडे वेळोवेळी पाठवावी.

५) पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांच्या कार्यालयाकडे बँकांच्या कर्जवसुली व जप्ती संदर्भात प्राप्त झालेल्या अर्जाची किमान पोलीस निरीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्यांमार्फत मार्फत पडताळणी करावी. योग्य कागदपत्र असल्याची खात्री झाल्यास पुरेसा बंदोबस्त पुरविण्यात यावा. बंदोबस्त पुरविण्यास टाळाटाळ करू नये. तसेच बंदोबस्त पुरविण्यात आल्यानंतर संबंधित बँकेकडून नियमानुसार विहीत केलेले बंदोबस्त शुल्क आकारण्यात यावे. सदर बंदोबस्त शुल्क प्राप्त करून ते रितसरपणे शासकीय तिजोरीत जमा करण्यात यावे व त्याची योग्य ती नोंद ठेवण्यात यावी.

६) नागरी सहकारी बँका व सहकारी पतसंस्था यांना कर्जवुसलीसाठी पोलीस बंदोबस्त देताना खालीलप्रमाणे काळजी घ्यावी.

अ) ज्या थकबाकीदारांविरुध्द जप्तीची कारवाई करावयाची आहे त्या बंदोबस्ताची मागणी किमान १५ दिवस आधी प्राप्त झालेली असावी.

ब) जप्ती कारवाई ही शक्यतो कार्यालयीन कामकाजाचे दिवशी सुर्योदय ते सुर्यास्ताच्या आत करावी.

क) जप्ती कारवाईच्या वेळेस संबंधित बँक/पतसंस्था अधिकारी यांनी व्हिडीओ चित्रण करावे व ते योग्य प्रकारे जतन करावे.

ड) सुरक्षिततेच्या अनुषंगाने भारतीय रिझर्व्ह बँकेने दिलेल्या मार्गदर्शक तत्वांची काटेकोरपणे अंमलबजावणी बँकांनी करावी.

वरील सर्व सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०१२९१३११३६०८२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Damodar Patil

Digitally signed by Vijay Damodar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay Damodar Patil
Date: 2019.01.29 13:24:48 +05'30'

**(विजय पाटील)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन
गृह विभाग.

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई.

५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

६) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) प्रधान सचिव, सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई..

८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९) सर्व पोलीस आयुक्त.

१०) सर्व परिक्षेत्राचे विशेष पोलीस महानिरीक्षक.

११) सर्व जिल्हाधिकारी.

१२) सर्व पोलीस अधीक्षक.

१३) निवड नस्ती.